शाखा अभियंता (गट-ब) संवर्गातून उप वनअभियंता (गट-अ) संवर्गात पदोन्नतीने पदस्थापना.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन आदेश क्रमांक: क्र. एमएफएस-०९.२३/प्र.क्र.१७३/फ-८**
हुतात्मा राजगुरु चौक,मादाम कामा मार्ग ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १६ मार्च, २०२४.

**शासन आदेश :-**

सन २०२२-२३ वर्षाच्या निवडसूचीमधून शाखा अभियंता, गट-ब संवर्गातून उप वनअभियंता गट-अ संवर्गात सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | जात / प्रवर्ग | पदोन्नतीने पदस्थापना | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री.के.टी.डाखळे,<br>शाखा अभियंता, अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व नागपूर | इ.मा.व. | उप वन अभियंता, वनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर यांचे कार्यालय | रिक्त पदावर |

**२. वरील अधिकाऱ्यांना निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील अटींच्या अधीन राहून पदोन्नती देण्यात येत आहे.**

२.१ निवडसूची तयार करतांना कोणीही ज्येष्ठ अधिकारी अनावधानाने वगळण्यात आलेले नाहीत अथवा अधिक्रकमित झालेले नाहीत.

२.२ मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७ च्या निर्णयाच्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाजेष्ठतेनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग/१६ब कार्यासनाच्या दि.०७/०५/२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे. तसेच दि. ७ मे, २०२१ च्या शासन निर्णयाप्रमाणे मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सहमती देण्यात येत आहे.

२.३ दिव्यांग कर्मचाऱ्यांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीबाबत मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या दि.२२.०७.२०२१ रोजीच्या निर्णयानुसार दिव्यांग आरक्षणासह पदोन्नतीसाठीची सर्व रिक्त पदे सा.प्र.वि./१६-अ यांनी दि.५.७.२०२१ व दि.२०.०४.२०२ रोजीचे शासन निर्णय व दि.२३.७.२०२१ च्या शासन पत्रान्वये दिलेल्या सूचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे.

२.४ निवडसूचीतील ज्या अधिकाऱ्यांविरुध्द विभागीय चौकशी सुरु असेल त्यांच्याबाबत सा.प्र.वि. शासन निर्णय, दि.१५.१२.२०१७ व दि.३०.०८.२०१८ नुसार विभागाने कार्यवाही करावी.

२.५ वरील अधिकाऱ्यांची पदोन्नती ही अंतिम जेष्ठतेच्या व त्यामध्ये होणाऱ्या बदलांच्या अधीन राहील व या पदोन्नतीमुळे वरील अधिकाऱ्यांना सदर पदोन्नतीच्या दिनांकापासून जेष्ठतेचा हक्क मागता येणार नाही.

२.६ सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व सेवाजेष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

२.७ महाराष्ट्र नागरी सेवा (जेष्ठतेचे विनियमन), नियमावली २०२१ मधील नियम २ (ड) मधील तरतुदीनुसार, पदोन्नतीने नियुक्ती होणाऱ्या सदर अधिकाऱ्यांनी पदोन्नतीचे आदेश निर्गमित झाल्याच्या तारखेपासून ३० दिवसांच्या विहित मुदतीमध्ये रुजू होणे आवश्यक राहील.

२.८ सदर अधिकाऱ्यांना देण्यात आलेली तात्पुरती पदोन्नती कोणतीही पुर्व सूचना वा नोटिस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवीत आहे.

३. सदर पदोन्नत अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदोन्नतीने पदस्थापनेचे आदेश प्राप्त झाल्यापासून तात्काळ पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे कार्यमुक्त केल्यानंतर विहित मुदतीत ते पदस्थापनेच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना सदर पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे गृहित धरुन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.३०/०४/१९९१ व दि.१२/०९/२०१६ मधील नमूद तरतुदीनुसार शासनस्तरावरुन त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल. तसेच पदोन्नती नाकारणाऱ्या अधिकाऱ्यांना आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत उप वनअभियंता पदाचा १२/२४ वर्षाचा लाभ दिला असल्यास तो तात्काळ थांबविण्यात यावा व त्यांना स्वीय सहायक गट-अ संवर्गात प्रत्यक्ष पदोन्नतीनंतर सदरचा लाभ देण्यात येईल, याची कृपया नोंद घ्यावी.

४. पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्याने उप वनअभियंता, गट-अ या पदाचा कार्यभार ग्रहण केल्यावर वेतन निश्चितीचा विकल्प तात्काळ द्यावा. असा विकल्प न दिल्यास, त्यांची वेतन निश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियमावली १९८१ मधील नियम क्र.११ (१) (ए) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन करण्यात यावी.

५. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. सदर पदोन्नतीने पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यास नियंत्रक अधिकाऱ्यांनी पदोन्नतीच्या पदावर हजर होण्यास तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच संबंधित अधिकाऱ्यांना पदोन्नतीच्या पदावर हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते पदोन्नतीने पदस्थापनेच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी शासनास ananda.shendge@nic.in या ई-मेल संकेतस्थळावर त्वरीत कळवावे.

६. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०३१६१४१०५५४५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BHAGWAN MARUTI SAWANT

Digitally signed by BHAGWAN MARUTI SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=8ee89eb0aec64f8bc0bdf8d85ddb4706d35abd8b73c618e114ee98d5c9ecf57b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C7DBA1C6B5F7AB2A6CABC4F7EAD8CFA74F8F7A0FADCAC76D8F1CF22569F16BD3, cn=BHAGWAN MARUTI SAWANT
Date: 2024.03.16 14:20:06 +05'30'

**( भगवान सावंत )**
**उप सचिव, महसूल व वन विभाग**

प्रति,

१. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, म.रा., पुणे.
५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर.
६. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन - दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र मुंबई/नागपूर
८. सर्व वनसंरक्षक/उप वनसंरक्षक
९. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्या.-१२), मंत्रालय, मुंबई-३२
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
११. प्रधान सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक.
१२. संबंधित अधिकारी / प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), म.रा.नागपूर यांचे मार्फत.
१३. निवड नस्ती (फ-८ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२